| शिर्षक | ग्रंथकार | विषय | विस्तार (पुर्ण/ अपूर्ण) | टिकाकार | आकार | पृष्ठे | लिपी | सामग्री | Lines per page | Letters per line | Condition & age (शके/विक्रम सवंत) | Additional Particulars / Remark |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मनश्चंद्रबोध | - | धर्म | अपूर्ण | - | 3/12 | 56 | मराठी | कागद | 9 | 41 | शके. 1808 | |

M-2936

भ्रमा ॥ राज्यउत्तमचालविल ॥ ३६ ॥ आणिकपरीसेमनानिवाडें ॥ अन्यपुत्रआमुचेबळियाढे ॥ येकेक
आकळिनांनातुडे ॥ आपुल्यापाडेंत्रिभुवनीं ॥ ३७ ॥ येचीकामक्रोधादिसकळी ॥ मदमत्सरादिमहाब
ळो ॥ तेहींठेऊंमोहाजवळी ॥ अतिबळेंपाठीराखे ॥ ३८ ॥ आशातृष्णादिसाजणी ॥ मोहाचियानिजबहि
णी ॥ त्याहीअसतीनिदानी ॥ मोहालागोनीअवधारा ॥ ३९ ॥ आणिकएकऐकविचार ॥ मेळउंसोयराधु
रंधर ॥ तिहींलोकामाजीसधर ॥ देखासाचारप्रपंच ॥ ४० ॥ त्यासींसोयरीककरितां ॥ बरवेवाटेनृपनाथा ॥
हामोहासींआधारसर्वथा ॥ होईलपाहतांनेमस्त ॥ ४१ ॥ जरीत्याचाआधारजोडला ॥ तरीमोहमहिमे
सपावला ॥ आह्मासंसोयराजोडला ॥ मोठाभलालौकिक ॥ ४२ ॥ याप्रपंचाचीकुमरी ॥ भुलीनामेंसुं
दरी ॥ तीचवरूंनोवरी ॥ अतिसाजिरीमोहासीं ॥ ४३ ॥ तीभुलीमोहाचेंभूषण ॥ तीभुलीमोहाचेंलाव
ण्य ॥ तीभुलीमोहाचेंआग्रगण ॥ जाणेनिपुणराजिया ॥ ४४ ॥ तीअतिदिसेचांग ॥ नसोडीमोहाचेंआं

म.चं. ग ॥ तोहीजालासपत्नीकसांग ॥ योग्यराज्याधिकारी ॥ ४५॥ तयापाहेदोघांजणां ॥ बरवेंघटितार्थआ अ०
हेजाणा ॥ तिचेनिसाजिरामोहराणा ॥ यात्रिभुवनामाझारी ॥४६॥ आणिमीसुनमुखदेखेन ॥ तिचेंहा २
॥ ३ ॥ तेंघरवातलावीन ॥ तोभुलवीलसंपूर्ण ॥ भल्याविरक्तासीं ॥४७॥ माझीयामनीभूपाळा ॥ पाहवापुत्ररा
ज्याचासोहळा ॥ जनासीआनंदआगळा ॥ मोहाचेनीहोईल ॥ ४८॥आह्मांतुह्मांह्मातारपण ॥ रायासह
जचिआलेंजाण ॥ यालागीमोहाधीन ॥ राज्यसंपूर्णकरावें ॥४९॥ यामोहाभुलीकरितां ॥ आह्मातरुण
पणयेईलसर्वथां ॥ ऐसीयाचीसामर्थ्यता ॥ जाणवतेंआतांमजलागीं ॥ ५०॥ आणिचराचरविवेक ॥
पाहेलपुत्रराज्याचेंसुख ॥ तेणेंवाढेलकवतुक ॥ आह्मादेखदोघांसीं ॥५१॥ ऐसेंप्रवृत्तीनेंबोलतां ॥ तेंमा
नलेंमननृपनाथा ॥ मगतोजालाविचारिता ॥ तयांउभयतांप्रधानां ॥ ५२ ॥ संकल्पविकल्पांतेंह्मणेम
न ॥ तुह्मामानलेंहेंवचन ॥ जेप्रवृत्तीबोललीआपण ॥ राज्यजाणमोहाद्यावें ॥ ५३ ॥ तंवतेदोघेअनुवा

दती ॥ राणीनें केलीवरवीविनंती ॥ आज्ञासहीमानलीनृपती ॥ राज्यसंपत्तीमोहाद्यावी ॥ ५४ ॥ प्रधाना
चियाबोला ॥ मनराजासंतोषला ॥ घावोनिशाणादिधला ॥ फोडिताजालाभांडार ॥ ५५ ॥ तेंविषयभां
डारेंअगाध ॥ शब्दस्पर्शरूपरसगंध ॥ उचितदिधलेप्रसिद्ध ॥ मनेंविविधजनातें ॥ ५६ ॥ पुनरपिप्रवृत्ती
अनुवादत ॥ ह्मणेरायासांगतसेंहित ॥ विवाहकरावाजीत्वरित ॥ जाणनेमस्तमोहाचा ॥ ५७ ॥ तेंऐको
नीनृपवर ॥ प्रपंचपाचारिलाशीघ्र ॥ तयाचीकंन्याभुलीसुंदर ॥ तेसत्वरआणविली ॥ ५८ ॥ मगपाहूनि
सुमुहूर्त्त ॥ भुलीप्रपंचहातींधरीत ॥ अज्ञानउभयसत्तेंत ॥ मोहोतेथेंत्यापाठीं ॥ ५९ ॥ भ्रमेंअक्षताघेतली
या ॥ दोघाच्याअंजुळीसुदलिया ॥ ॐपुण्याहह्मणोनीघातलीया ॥ अविवेकेंमस्तकी ॥ ६० ॥ प्रपंचाची
स्त्रीस्मृती ॥ तेधारघालीयथानिगुती ॥ आशातृष्णादिसमस्ती ॥ वोवाळितीकुरवंडी ॥ ६१ ॥ ऐसेंलग्नलाग
लें ॥ दिसतीवधुवरेंचांगलें ॥ मगबोहलीयावरीवैसविलें ॥ तेंबळहव्यासाचें ॥ ६२ ॥ अवक्रियेचेंकंकण ॥

म. चं. अवनितीचेंलोण ॥ त्याच्यापालवीसंपूर्ण॥बांधीजाणदुर्बुद्धी ॥ ६३॥ तयामोहाभुलीशेशपाट॥ भरीप्रव अ०
त्तीमनसुभट॥ मगप्रपंचधरूनीयानेट॥ राजबिदीनीटमिरविली ॥६४॥ लौकिकचांगराजबिदी॥ मेळ २
॥ ४ ॥ उनीभेदाचीमांदी॥ जालीग्रहप्रवेशसिद्धी ॥ कुबुद्धीकुतर्कत्यापासीं ॥ ६५॥ यानंतरेंप्रवृत्तीमनतेथ ॥ पा
होनियांसुमुहूर्त ॥ मोहद्दाराज्यींबैसवित ॥ उल्हासततेकाळीं ॥ ६६ ॥ तेथेंवाजतीमंगळतुरे॥ शब्दअश
ब्दाचीगंहिरे॥ तेणेनादेंचराचरभरे ॥ अतिगजरेंपरीयसा ॥ ६७ ॥ मनप्रवृत्तीदोघाजनी ॥ मोहोबैसवि
लासिंहासनी ॥ पूजियेलाकवणेमानी ॥ तेश्रोतेजनीपरिसावें ॥ ६८ ॥ कुळतेचीसिंहासन॥ तयावर
चंचळतेचीआसन ॥ तेथेमोहोराजाजाण ॥ सुमुहूर्तेंआणोनबैसविला॥ ६९ ॥ माथामुगुटअभिमा
नाचा ॥ वरीतुराखोविलागर्वाचा ॥ तेणेशोभापावलासाचा ॥ मोहोदैवाचाराजेंद्र ॥ ७० ॥
मानतोचीतिलकलल्लाटी ॥ दुःखउद्वेगकुंडलेंश्रवणपुटी ॥ तेंदेखोनीयादृष्टी ॥ प्रवृत्तीपोटीउल्हास

॥ ७१ ॥ आक्रोशजाणतांबोल ॥ वरीरंगलेकल्लोळ ॥ माजीदंतपंक्तीझळाळ ॥ अतिउजळस्नेहाचा
॥ ७२ ॥ प्रलापदेखाचंदन ॥ सर्वांगींकेलेंलेपन ॥ वरीपरिमळद्रव्यजाण ॥ परीपूर्णलोभाची ॥ ७३ ॥
तयावरीकंठमाळा ॥ अविद्येचियासुढाळा ॥ तेणेंतेजेंघवघविला ॥ विकाशलाजगत्रयीं ॥ ७४ ॥
हृदयावरीचिंतापदक ॥ शोभादावीलौकिक ॥ वरीसुमनमाळादेख ॥ अतिचोखप्रमदाची ॥ ७५ ॥
लालुप्यतिचेंबाहुभूषणें ॥ लटिकेपणाचींकंकणें ॥ आपलासंशयोमनें ॥ मुद्रिकातेणेंशोभली ॥ ७६ ॥
कटिसूत्रनेटापाटाचें ॥ मोहाकटींशोभेसाचें ॥ चरणींगर्जनवांकीचे ॥ अतीनादाचेअशुची ॥ ७७ ॥
निंदाहाचीतोडर ॥ करिनिंदेचागजर ॥ मीमाझेंपणाचाविचित्र ॥ मनोहरपादुका ॥ ७८ ॥ विकाराची
अंगीसाजिरी ॥ अविचारचीरतयावरी ॥ प्रपंचपांघूरविलाआपुलेकरीं ॥ राजाभारीशोभत ॥ ७९ ॥
जातीवर्णआश्रम ॥ तींछत्रेंचामरेंउत्तम ॥ मेघडंबरेंअनुपम ॥ महत्वाचेरम्यशोभले ॥ ८० ॥ हिंसाशस्त्रें

शोभेकरीं ॥ घातकशस्त्रकटीवरी ॥ दर्पणचंचळतेभारी ॥ भेदकरीसाजिरा ॥ ८१ ॥ तारुण्यवयहेंविध



न ॥ तपनानाखाद्यपक्वान्न ॥ त्रिविधतापदीपन ॥ दिवटीसुलक्षणरायापासीं ॥ ८२ ॥ रूढपणतेंचिकीर्त्ति



मुख ॥ शोभेरायासन्मुख ॥ असंतोषाचेकुंचेदेखसुरेख ॥ दोहींभागीडुल्लताती ॥ ८३ ॥ कठिणत्वतेतरवा

र ॥ अपकीर्तीबंदीजनसमोर ॥ पुढेंअप्सरामनोहर ॥ अतिअविचारकुकर्मांच्या ॥ ८४ ॥ दुंदुभीआणि

भेरी ॥ रजतमाच्यावाजतीगजरीं ॥ तोनादत्रैलोक्यामाझारी ॥ भरोनिभारीदाटला ॥ ८५ ॥ गुढियातोर

णेंसाजिरीं ॥ आत्मस्तुतीघरोघरीं ॥ मदेरंगमाळापरोपरी ॥ दारोदारींविकाराच्या ॥ ८६ ॥ यारीतिमनआ

णिप्रवृत्ती ॥ मोहोरायागौरवीती ॥ मगतोचालवीराज्यस्थिती ॥ तेणेंप्रवृत्तीउल्हासे ॥ ८७ ॥ याउपरीम

नसहज ॥ वदेअहंकारागुज ॥ तयातेंह्मणेमनराज ॥ चालवाराज्यप्रधानपणें ॥ ८८ ॥ ऐसेंबोलोनितया

सीं ॥ प्रधानत्वदीधलेंपरियेसीं ॥ अहंमतीतयापासीं ॥ असेकैसीअपार ॥ ८९ ॥ तयानंतरतोअज्ञान ॥

केलादुसराप्रधान ॥ मोहातेंहातींदेऊन॥ आभारपूर्णघेतला ॥ ९० ॥ मगकेलेसभामंडळिक ॥ भ्रमआ
णिअविवेक ॥ पाचारूनीपुत्रसकळिक ॥ मगबोलेतयांसीं ॥ ९१ ॥ लोभआणिकामक्रोध ॥ दंभादि
कमत्सरमद ॥ तयांतेंह्मणेसन्निध ॥ असासावधमोहापासीं ॥ ९२ ॥ प्रवृत्तीबोलेउत्तर ॥ पुत्रहोऐका
सादर ॥ कवणहीयेतीनिवृत्तीकुमर ॥ त्यां अपारदंडावें ॥ ९३ ॥ ऐसीबोलोनियाबोली ॥ देशदुर्गेंतयादि
धलीं ॥ तयांचींनावेंऐकिलीं॥श्रोतीभलींपाहिजे॥ ९४ ॥ सकळराज्यमोहाधीन ॥ प्रधानाचेअनुमतेंजा
ण ॥ कामाधीनकेलेंशिस्न ॥ नेत्रस्थानक्रोधाचें ॥९५॥ जिव्हासमर्पिलीलोभा ॥ मदमान्यस्थानींउभा ॥
ह्रदयाचामध्यगाभा ॥ मत्सरास्वयंभदिधला ॥ ९६ ॥ दंभावोपिलीत्वचा ॥ प्रपंचबैसलाजेथेंवाचा ॥
भ्रमआणिअविवेकाचा ॥ राबत्यांचापैंतेथें ॥ ९७ ॥ ऐसेप्रवृत्तीआणिमन ॥ देशदुर्गेंदेतवांटोन ॥ तेणें
कामादिसंपूर्ण ॥ संतोषजाणजाहले ॥९८॥ आदरदेखोनिदोघांचा॥ कामक्रोधबोलतीवाचा ॥ कवण

बळियाढानिवृत्तीचा ॥ आह्मासन्मुखयेईल ॥ ९९ ॥ बळदेखोनिपुत्रांचें ॥ प्रवृत्तीअनुवादेवाचे ॥ ह्मणे
तुह्मापासोनिआमुचें ॥ चित्तसाचेंसुचित ॥ १०० ॥ यारीतिमनआणिप्रवृत्ती ॥ मोहोराज्यींबैसविती ॥
आपणहीवर्तोंलागती ॥ व्यापकत्वास्थितीश्रेष्ठत्वें ॥ १ ॥ मगआपणास्वाधिनमनें ॥ समीपठेवीदहावह
ने ॥ त्यांचींनावेंसावधानें ॥ ऐकाश्रवणींसज्जनहो ॥ २ ॥ श्रोत्रत्वचाचक्षुजिव्हाघ्राण ॥ वाचापाणीपाद
गुदशिस्न ॥ इतुकेसमागमेंघेऊन ॥ घरटीअनुदिनघालीत ॥ ३ ॥ जेवेळींजावरीआवडीउठी ॥ तेवेळींबैसे
तयाच्यापाठी ॥ नानाविषयघेवोनिशेवटीं ॥ महाहटीलावित ॥ ४ ॥ जेवेळींश्रोत्रींवळघे ॥ तेव्हांनादऐकोला
गे ॥ ऐकोनीयांगायनरंगें ॥ आवडीचेनी ॥ ५ ॥ जेव्हांबैसेत्वचेच्यापृष्ठीं ॥ तेव्हांस्पर्शशोभेनिगुती ॥ आलिं
गनादिपरिपाठी ॥ स्वयंभमिठीघालित ॥ ६ ॥ जेकाळींचक्षुवरी ॥ मनअरोहणकरी ॥ वळंघतांचिवेगेंध
री ॥ विचित्रपरीरूपाची ॥ ७ ॥ जेव्हांजिव्हेचीधरीकास ॥ रसभोगीसावकाश ॥ कटुअम्लगोडतीक्ष्णसु

रस ॥ सेवीरसरुचीनें॥८॥घ्राणावरीस्वारजेकाळीं ॥ तेवेळींहावपरिमळीं ॥ आणीकआठवणतेकाळीं॥
जायसकळविसरोनी॥९॥वाचेचापालवी ॥ बैसोनीवक्तत्वदावी ॥नित्यनवीविस्तारवी॥वाग्देवीदेवता
॥ १० ॥ पाणीइंद्रियकरीआसने ॥ तेव्हांकरीघेणेंदेणें ॥ नानावस्तुहातींधरणें ॥ व्यापारकरणेंपरियेसा
॥ ११ ॥ पादइंद्रियावरीबैसणेंघडे ॥ तेवेळींचालणें आवडे ॥ मगगमनकरूंलागेवावडें ॥ वाडेंकोडेंपंथपें
॥ १२ ॥ कवणेयेकेकाळींदेख ॥ शिश्नइंद्रियेंपाहेसुख ॥ तेवेळींभोगीरतिसुख ॥ कामास्तव आनंदें ॥
॥ १३॥ गुदाचीयेपडेसंगती ॥ तेव्हांमूत्रोत्सर्गहोती ॥ ऐसींवाहनांचीगती ॥ मनाप्रती आवडे ॥ १४॥ याव
हनावेगळेंकर्मन ॥ स्वये आपणचीकरीगमन ॥ क्षणमात्रेंत्रिभुवन ॥ हिंडोनीयेतवेगीं ॥ १५ ॥ देखिलि
याठायींपावे ॥ नदेखलियाठायींधांवे ॥ कवणानकळेतेंघ्यावें ॥ व्यापारस्वभावेंतयाच्या ॥ १६ ॥ चपळ
पणेंचंचळ ॥ येकेठायींनराहेनिश्चळ ॥ काळआणिवेळ ॥ नस्मरेकेवळतयासीं ॥ १७॥ हास्वर्गहानरक ॥

 हेंपापहेंपुण्यचोख ॥ हेगतीहे अवगतीदेख ॥ नधरीलेखतेंमन ॥ १८ ॥ संकल्पविकल्पप्रधान ॥ तयासीं 
नविसंबेएकक्षण ॥ त्याचेस्नेहेंआपण ॥ मोहातेंजाणपाळित ॥ १९ ॥ यारीतिमोहोराज्यकरी ॥ अळंका 
 रोनसहपरिवारीं ॥ मनघरटीघालोनीदेशांतरी ॥ विषयभरीपूरवी ॥ १२० ॥ ऐसामोहोराज्यकरितां ॥
प्रवृत्तीचीसकळसत्ता ॥ नगरांतकरूंनेदीवार्ता ॥ पैंसर्वथानिवृत्तीची ॥ २१ ॥ इकडेइतुकेंवर्ततां ॥ तंव
मागीलऐकाकथा ॥ निवृत्तिनिरंजनींवर्ततां ॥ तेथें अपूर्वतावर्तली ॥ २२ ॥ तेचीकथाकौतुकदेख ॥ ऐक
तांवाटेसुख ॥ श्रीनाथह्मणेदेख ॥ हेसंतविशेषजाणती ॥ १२३ ॥ इतिश्रीमनश्चंद्रबोधेद्वितीयोध्यायर
साळहा ॥ २ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ 



श्रीगणेशायनमः॥ निवृत्तीमनेंघातलीबाहेरी॥ तैंतेहोतीगरोदरी॥ निरंजनींअसतांसुंदरी॥ प्रसूतवरी
तीझाली॥ १॥ पहिल्याकन्याझालिया॥ भक्तिशांतीक्षमादया॥ जवळीबुद्धिअसेदया॥ बहिणरायाम
नाची॥ २॥ तयावरीशीघ्र॥ उपजलेपांचपुत्र॥ भाववैराग्यविचार॥ विवेकसुंदरनिजबोध॥ ३॥ इतु
कींकन्याकुमरेंझालीं॥ तींदायीनेंवागविलीं॥ चालोंबोलोंलागलीं॥ सुलक्षणभलीसाजिरी॥ ४॥ ऐसे
तेनिवृत्तीसुंदरी॥ बाळकानविसंबेक्षणभरी॥ आणितीमातेच्याकडियेवरी॥ दिवसरात्रींखेळवी॥५॥
बाळेंवाढतीदिवसामासा॥ क्षणक्षणाअधिकहोतीवयसा॥ शांतिसगुणेपरीयेसा॥ नित्यमानसाआ
नंदे॥ ६॥ खेळावयाजातांबाहेरी॥ सकळांपुढेंभक्तीकुमरी॥ भावातेंहातींधरीं॥ तयासरीवैराग्य॥ ७॥
विचारतयासवेंचीं॥ आंगोळीधरोनीदयेची॥ गोडीधरोनीखेळाची॥ चालतीसवेंचीसमेळें॥ ८॥तया
मागेंविवेकपाही॥क्षमाधरोनीबाही॥निजबोधलाहीलाही॥शांतीसवेंचालतु॥ ९॥ भक्तीस्थळअपूर्वदा

म.चं. वी ॥ भावतेचस्थळींराहवीं ॥ वैराग्यविचारस्वभावी ॥ तेचांगजीवींमानिती ॥ १० ॥ विवेकाचेंवाटेवर अ०
वें ॥ दयाक्षमात्याचेसवें ॥ बोधेंनिश्चळवैसावें ॥ शांतीसवेंसेजारीं ॥ ११ ॥ ऐसेंनित्यकाळसुरेखें ॥ खेळ २
॥ १ ॥ खेळतीकौतुकें ॥ तेनिवृत्तीमायादेखे ॥ आनंदेंहरिखेंमानसीं ॥ १२ ॥ तयादृष्टीलागेलक्षणोनी ॥ विषय
सांडीओवाळूनी ॥ त्याबाळकातेंदेखोनी ॥ योगीमनींआनंदती ॥ १३ ॥ महानुभवीविरक्त ॥ तयासींकुमरें
आवडत ॥ आणित्याबाळकासतत ॥ प्रीतीलागतविरक्ती ॥ १४ ॥ निवृत्तीचेछंदेंराहाटती ॥ संतवचनीं
स्थिरावती ॥ संतहीत्याचेयुक्ती ॥ पैंराहाटतीअनुदिन ॥ १५ ॥ संतत्याकुमराचीगोडी ॥ कुमरासींसंता
चीआवडी ॥ उभयतांमिळालीयागोडी ॥ लागेआवडीस्वरूपाची ॥ १६ ॥ दिवसदिवसाप्रबुद्ध ॥ तंवतं
वसंताचाछंद ॥ तोदेखोनीविनोद ॥ वाटेआनंदनिवृत्तिसीं ॥ १७ ॥ प्रवृत्तिचेदेखतीहेर ॥ ह्मणोनिसमाग ॥ १ ॥
मेअसेनिरंतर ॥ परमार्थनामेसहोदर ॥ अतिचतुरनिवृत्तीचा ॥ १८ ॥ तोपरमार्थभोळा ॥ रंजवीतया

बाळा ॥ तंवतंवत्याचीअधिककळा ॥ दिसेस्वलीळासाजिरी ॥ १९ ॥ आणिसंतजाचीकुमरें ॥ स्तुतीस्तो
त्रेंअपारें ॥ तयासमागमेंनिरंतरे ॥ गातांसुस्वरखेळती ॥ २० ॥ दिवसदिवसाप्रभात॥ जाणतीअवघीं
हिताहित ॥ जवळीअसेपरमार्थ ॥ तोहिस्वहितसांगत ॥ २१ ॥ तंवकवणेएकेदिनीं ॥ साधुकुमरेंबोल
तीहांसोनी ॥ तुमचीनिवृत्तीजननी ॥ भ्रतारेंत्यजूनीसांडिली ॥ २२ ॥ मनराजातुमचापिता ॥ त्याचीप्र
वृत्तीबरीवार्ता ॥ राज्यदिधलेंतयाच्यासुता ॥ तुह्मासर्वथाटाकिलें ॥ २३ ॥ ऐसेंवचनऐकोन॥वंचकलेनि
वृत्तीचेनंदन ॥ मनींअनुतापधरून ॥ जननीसमीपपैंआले ॥ २४ ॥ येऊनीजवळीबैसती ॥ मातेनि
वृत्तीसींबोलती ॥ आह्मीएकऐकिलीकीर्ती ॥ तेसत्यकिंवामिथ्या ॥ २५ ॥ आह्मीकुमरमनाचे॥तरीआ
ह्मादवडीलेंसाचें ॥ कायअन्यायकेलेतुमचे ॥ कांघातलेंबाहेरी ॥ २६ ॥तूंतंवपट्टाचीभाज॥ कवणअन्या
यठेविलातुज ॥ प्रवृत्तीसींधरिलेंगुज ॥ सकळनिजसांगमातें ॥ २७॥ राज्यकीजेतिच्याकुमरीं ॥ आमु

म.चं. चीआठवणराजानकरी॥हेंगुजमातेझडकरी ॥ आह्मालागीसांगिजे॥ २८॥ ऐकोनिपुत्राचीं वचनें॥ निवृ अ०
त्तीगर्हिंवरलीअंतःकरणें॥क्षणेकासावधानें॥मगबोलेपुत्रांसीं॥ २९॥ह्मणेबारेनिजबोधाविवेका॥ वैरा ३
॥ २ ॥ ग्यविचारासुलक्षणिका ॥ भावादिकतुह्मोसमस्तऐका ॥ मातमाझीएकचित्तें ॥ ३० ॥ प्रवृत्तीचीगोष्टन
करावी ॥ मनाचीवार्तासांडावी॥राज्याचीआसनधरावी ॥ तुह्मीदेखा ॥ ३१ ॥ दूतप्रवृत्तीचेंऐकती ॥ तरी
आह्मादंडिती॥ आणितुमतें घातिती॥हेंनिश्चितीजाणपां॥ ३२॥ऐसेंमातेचेउत्तरऐकोनी॥विवेकादिबोल
तीप्रतिवचनीं॥येवढाधाककांमनीं॥तोजननीसांगपां ॥ ३३ ॥ ऐसेंपुत्रबोलतां॥पुनरपि अनुवादेमाता ॥
ह्मणेसमूळऐकाकथा ॥त्यान्नृपनाथामनाची॥ ३४॥पहिलेंनिर्गुणापासोनीहेंक्षेत्र॥निर्माणजालेंपवित्र॥
तेथेंत्रिगुणाचाविचार ॥ तोचांगविस्तारला॥ ३५॥तेंचीसत्वरजतमजाणावें ॥ वाढिंनलीसावयवें॥तेथें ॥ २ ॥
निपजलींपंचतत्वें ॥ सत्वींसमुदायपंचभूतें ॥ ३६ ॥ अक्षरहोतेंतेंक्षरलें ॥ तेचित्रिगुणविस्तारलें ॥ विस्ता

रूनियांजालें ॥ पिंडब्रह्मांडसावयव॥३७॥ अव्यक्ततेंचि अक्षर ॥ व्यक्ती आलीह्मणोनिक्षर ॥ यादोहींसीं
साचार॥संगथोरक्षेत्राचा॥३८॥येथेंप्रपंचविस्तारला अद्भुत॥त्यातेंनाहींगणित॥ ह्मणोनिक्षेत्रातेंबोलि
जेत ॥ मनपुरऐसें ॥ ३९॥ आतांकितीबोलोंविस्तार ॥ हेंपंचभूतक्षेत्र ॥ मनराज्यचालवीविचित्र॥ अति
चतुरचपळपणें॥४०॥ यामनाऐसाव्यापक ॥ पाहतांनदिसे आणिक ॥ जीजीवस्तुदेखेचोख॥ गुंतेअव
श्यकतेथेंपैं ॥ ४१ ॥ यामनाचेंकायसांगोनिकें॥ देखिलेठांयासोकें॥ ह्मणोनितात्काळमादेखे ॥ तेंसरो
खेवरिष्ठ॥ ४२ ॥ इंद्रियाणांमनश्चास्मिऐसें ॥ गीतमाजिबोलिलेंअसे॥ तत्वामाजीपरियेसे ॥ तेंविशेष
वरिष्ठ॥ ४३ ॥ यालागींमनराजा॥ सकळइंद्रियेंत्यांचीप्रजा ॥ क्षेत्रचालवीतोंपैजा ॥ अतिपैजापुरुषा
थें ॥ ४४ ॥ ऐसीयामनासमीप ॥ प्रधानसंकल्पविकल्प ॥ त्याचेसंवादेंआप ॥ राज्यरूपचालवी ॥ ४५॥
तयामनागतीअवगती ॥ बद्धमोक्षप्राप्ती ॥ विधीनिषेधचालवीजेति॥ संकल्पमतीविकल्पें ॥४६॥ ऐसि

म.चं. यामनानृपनाथा ॥ प्रथममीमनाचीकांता ॥ ज्ञानजाणामाझापिता ॥ वरिष्ठसर्वथात्रैलोक्यीं ॥४७॥ म अ०
नेंतयाउपरी ॥ प्रवृत्तीपर्णिलीदूसरी ॥ तीअज्ञानाचीकुमरी ॥ अतिअविचारीमोहनी ॥४८ ॥ जैसेंतयेतें ३
॥ ३ ॥ वरिलें ॥ तैसेंतिणेंमनामोहिलें ॥ प्रपंचक्रियातिचेनिबोलें ॥ चालवीभलेराजेंद्रा ॥ ४९ ॥ तिचीक्रियादे
खोनिभारी ॥ मनगुंतलेंतियेच्याआहारी॥ मजवरीप्रीतीनकरी॥ मोहसंसारीतिचेनी ॥ ५० ॥पुत्रहोतैपा
सून ॥ माझीनकरीआठवण ॥ अतिचंचळराजामन ॥ जालाजाणतिचेनी ॥ ५१॥ प्रवृत्तीनेंकोडेंकेलें॥
मीनावडेंबाहेरघातलें॥ मीहितेंस्थळत्यजिलें ॥ तैंमीहोतेसगर्भ॥५२॥ मीआलेंनिरंजनआश्रमा॥मागें
प्रवृत्तीचामहिमा॥ तीप्रवर्तलीकुकर्मा ॥ तेंमीतुझांसांगेन ॥५३॥ लावण्यलाघवेंभुलविलें॥सैराधांवेति
चेनिबोलें॥ऐसेंबहुतकाळक्रमिलें॥तिचेनिबोलेंजाणपा॥५४॥तंवप्रवृत्तीगरोदर॥प्रसवलीसातकुमर॥ ॥ ३ ॥
मनाआवडतीफार ॥ आपत्येसमोरमनाकडे ॥ ५५ ॥ त्याअपत्याचेंमेळें ॥ मनवर्तोंलागले ॥ प्रवृत्ती

चेकरिह्मणीतलें ॥ संतोषभलेसर्वदा ॥ ५६ ॥ प्रवृत्तीबोलेंहर्षला ॥ मोहराज्यींस्थापिला ॥ प्रधानअहंका
रकेला ॥ प्रवृत्तीपितादुजाअज्ञान ॥ ५७॥ भ्रमआणिअविवेक ॥ दंभद्वेषादिसकळीक ॥ केलेसअेचे
मंडळिक ॥ मनेंदेखसंभ्रमें॥५८॥ कामक्रोधादिअसुर॥लोभआणिमदमत्सर ॥ मोहाधाकुटेसहोदर॥ते
चिथोरपाठीराखे ॥५९॥ तयास्थळींसन्निध ॥ व्यापोनिअसतीसावध ॥ रात्रंदिवसत्हृदयींद्वंद ॥ वाहती
विरुद्धतूमचें॥६०॥तयावेगळालीपुरेंपट्टणें॥दिधलींरायामनें॥तेणेंव्यापलीआपुलींस्थानें ॥ संनिधपणें
समभारें ॥ ६१ ॥ तेअसतीसदाउन्मत्त ॥ आपुलेबळेंजगव्यापित॥विश्वसकळभ्रांत ॥केलेनेमस्तप्रवृत्ती
सुतीं ॥ ६२ ॥ ऐसामोहोकरीराणिव ॥ रायेंपूर्वींचकेलात्याविवाहो ॥ प्रपंचाचीकन्याअपूर्व ॥ भुलीतया
तेंदिधली ॥ ६३ ॥ तीभुलीपतिव्रता ॥ मोहनसांडीसर्वथा ॥ तिचीदेखोनीलावण्यता ॥ जगसर्वंवेडा
वलें ॥ ६४ ॥ ऐसामोहोराज्यकरी ॥ प्रवृत्तीस्वामित्वभारी ॥ धेंडेंपिटीघरोघरीं ॥ निवृत्तीसींनभजावें

॥ ६५ ॥ यालागींदूतप्रवृत्तीचे ॥ नगरीहिंडतीमावेचे ॥ ऐसेंराज्यचालवीमोहाचें ॥ तेंप्रवृत्तीअविचा
रें ॥ ६६ ॥ मगराजातयेसीगुंतला ॥ मोहाधीनजाहला ॥ आमुचीआठवणभूपाळा ॥ कदाकाळींनव्हे
ची॥६७॥ ह्मणोनीतुह्मातेह्मणें ॥ त्याचीगोष्टीकाढाझणे॥तिहींऐकिलीयाकारणें ॥ नसांडीतीप्राणेंकदाहीं
॥६८॥ ऐसीनिवृत्तीसांगत॥ ऐकतांहासतीपुत्रसमस्त ॥ मगविनवीलीत्वरित ॥ निवृत्तीमाता॥६९॥ह्मण
तीमातेपरीयेसी॥त्यांचेंभयनाहीं आह्मासीं॥राज्यघेऊनीतियेसीं ॥ शिक्षाआतांलाऊंपां॥ ७० ॥विवेका
दिह्मणतीकोडें ॥ हेकामक्रोधबापुडे ॥ त्यांचेंकांहींनचलेआह्मापुढें ॥ हेंबोलणेसत्यपां ॥ ७१ ॥ आमुचेंरा
ज्यआह्मीघेतां ॥ तूतेंमातेकायसीचिंता ॥ तयाकोणराखेलआतां ॥ त्यातेंसर्वथादंडीन ॥ ७२ ॥ आणितूं
ह्मणसीअहंकार ॥ प्रधानत्याचाआहेक्रूर ॥ तरीतोहीएकप्रकार ॥ आह्मीविचारलक्षिला ॥ ७३ ॥ तरींतो
आमुचापिताजाण॥ तोचिआह्मीकरूंप्रधान ॥ बुद्धिवंतआणिसज्ञान ॥ आह्मापूर्णआधारूं ॥ ७४॥ तो

जरीमंत्रीजोडला ॥ तरींन आतळोंकळीकाळा ॥ मग अहंकारतोंकेतुला ॥ ज्ञानाजवळीसन्मुख ॥ ७५ ॥
तेंचिअज्ञानकायबापुडें ॥ जंवज्ञानाचीदृष्टीनपडे ॥ तंवचीतेंबापुडें ॥ बळपडीपाडेंमिरविती ॥ ७६ ॥ ज्या
सींघडेज्ञानाचीप्राप्ती ॥ त्यासीसिद्धीकरजोडिती ॥ ज्ञानावेगळीख्याती ॥ नवाढेकीर्तीकवणाची ॥ ७७ ॥
ज्ञानसाध्यज्यालागुनी ॥ तोचीपुरुषत्रिभुवनी ॥ ज्याच्याज्ञाननाहींमनीं ॥ तोपुरुषकवणेनमानावा ॥
॥ ७८ ॥ संतमहंतमहानुभाव ॥ ज्ञानेंचीपावलेगौरव ॥ ईश्वरादिसर्व ॥ पावलेथोरीवज्ञानेंपैं ॥ ७९ ॥ ऐ
सेंध्यानसधर ॥ त्यापुढेंकायहाअहंकार ॥ कामक्रोधमदमत्सर ॥ तयासमोरनराहती ॥ ८० ॥ तरीमाते
एककरावें ॥ तयाज्ञानातेंआणावें ॥ भक्तीभावापाठवावें ॥ मूळस्वभावेंझडकरी ॥ ८१ ॥ तयाभक्तिभा
वेविण ॥ ज्ञानसाध्यनव्हेजाण ॥ तरीभक्तिभावालागून ॥ झडकरोनीपाठविजे ॥ ८२ ॥ भक्तिपासीनव
गुण ॥ अर्चनकीर्तनश्रवण ॥ वंदनपादसेवन ॥ दास्यसख्यआत्मनिवेदनपैं ॥ ८३ ॥ भावतरीतोभावें ॥

भक्तीधरलीनसोडीजीवें ॥ यालागीस्वभावें ॥ पाठवावेंयादोघांसीपैं ॥८४॥ ऐसींपुत्रवचनेंऐकतां ॥ संतोषलीनिवृत्तीमाता ॥ पाठवितीजालीत्वरिता ॥ मूळतयाज्ञानासीं ॥८५॥ आतांज्ञानआलीयावरी ॥ बोधहोईलराज्याधिकारी॥ श्रीनाथदासह्मणे अवधारी ॥ पुढेंसाजिरीहेकथा ॥८६॥ इतिश्रीमनश्चंद्रबोध ॥ मनप्रवृत्तीसंवाद ॥ निवृत्तीविवेकादिअनुवाद ॥ तृतीयोऽध्यायरसाळहा ॥३॥ ॥८७॥ ॥छ॥





श्रीगणेशायनमः॥ तेंज्ञानअतिनिर्मळ ॥ जैसेंचिदानंदीं अढळ ॥ तयासींपाठवीमूळ॥तेवेल्हाळानिवृत्ति
॥ १ ॥ तेचिकाळींतत्क्षणीं ॥ भक्तिभावांपाचारोनीं ॥ तयांतेंह्मणेनिवृत्तीजननी ॥ कार्यसाधुनीत्वरित
यावें ॥ २ ॥ तुह्मीजावेंज्ञानापासीं ॥ उत्तरेंबोधावेंतयासीं ॥ जेणेंवश्यहोयआह्मांसीं ॥ तेंक्रियेसीं आचरा
वें ॥ ३ ॥ नानाउपायेंआणावेंज्ञानासीं ॥ बरवेंहोईलआह्मासीं ॥ महोत्साहेंतयासीं ॥ मातेंशीघ्रआणि
तां ॥ ४ ॥ नवविधप्रकारेंपूजीन ॥ सत्वरघेवोनयेईन ॥ निवृत्तिमातेसींनमून ॥ आणावयाज्ञानदोघेंगे
लीं ॥ ५ ॥ उभयवर्गेंसुबुद्धें ॥ भावमार्गेंभक्तीपुढेंचमके ॥ ज्ञानापासींयेवोनींदेखें ॥ उभीसन्मुखराहिली
॥६॥तंवभक्तीभाववेगीं॥ नमस्कारितीसाष्टांगीं॥नवविधपूजातयालागीं ॥ समर्पितीवेगींतेकाळीं॥७॥
बहुतशास्त्रश्रवणें ॥ संतवचनेऐकणें ॥ तेचीतयाकर्णभूषणें ॥ दोघेंजणेंघालिती ॥ ८ ॥ कीर्तनतेचिदक्षि
णा ॥ अतिअमुपनाहींगणना ॥ तीसमर्पिलीजाणा ॥ तणेंज्ञानाउल्हास ॥ ९ ॥ स्मरणाचींखाद्यभोज्यें ॥

म. चं. तयापुढेंठेविलींओजें ॥ तींज्ञानेंदृष्टिदेखिजे ॥ आनंदउपजेपाहतां ॥ १० ॥ पादसेवनपादुका ॥ अतिसि अ०
द्धिदायका ॥ चरणींघातल्यासुरेखा ॥ आदरेंदेखातेसमर्थी ॥ ११ ॥ अर्चनतेंचिचंदन ॥ सर्वांगींकेलेंले ४
॥ १ ॥ पन ॥ वंदनतेंसुगंधसुमन ॥ तेचरणींजावोनीवाहिलीं ॥ १२ ॥ दास्यनानाउपचार ॥ सख्यत्ववस्त्रपीतांब
र ॥ पारणेंनिरविलेंसपुर ॥ तेणेंसुखथोरतयासीं ॥ १३ ॥ नैवेद्यआत्मनिवेदन ॥ पुढेंठेविलाआनंदोन ॥
तोंदेखतांचिज्ञान ॥ बहुसंतोषोनीसुखीजाला ॥ १४ ॥ प्रेमाचीयेरत्नमाळा ॥ घातल्यातयाच्यागळां ॥
प्रीतीचियातांबूला ॥ मुखकमळशोभत ॥ १५ ॥ ऐसीभक्तिपूजाकरीस्वभावें ॥ तेस्थळींभावदृढावे ॥ तेंदे
खोनीस्वभावें ॥ ज्ञानमानवेमानसीं ॥ १६ ॥ मगजोडोनीयांदोन्हीकर ॥ उभीज्ञानासमोर ॥ वाटपाह
तीसादर ॥ बोलेलउत्तरह्मणोनी ॥ १७ ॥ मगतिलापोटाशींधरून ॥ समीपबैसविलींकृपेंकरून ॥ बोल ॥ १ ॥
ताजालासुवचन ॥ आदरेंकरूनदोघांसीं ॥ १८ ॥ ह्मणेकवणाकार्यातुमतें ॥ निवृत्तीनेंपाठविलेंयेथें ॥

क्षेमआहेतकींनिश्चितें ॥ समस्तबंधूवर्गपैं ॥ १९ तीनिवृत्तीवेल्हाळ ॥ बरवीआहेकींकुशळ ॥ तुह्मापाठ
विलेंमूळ ॥ तेंताल्काळसांगपां ॥ २० ॥ कवणकाजअसेमांडिलें ॥ तेंमजसांगाबोलें ॥ जेंनिवृत्तीनेंअसे
कल्पिलें ॥ तेंसिद्धीवहिलेपाववीन ॥ २१ ॥ जेकल्पिलीआहेकल्पना ॥ तेकळलीअसेंज्ञाना ॥ परीपुसेंस्ने
हार्थजाणा ॥ आनंदघनाह्मणोनी ॥ २२ ॥ ह्मणतीऐकाहोताता ॥ तिहींलोकींतूंसमर्था ॥ तुह्माबोलावीनि
वृत्तिमाता ॥ ह्मणोनिसर्वथाआलोंजी ॥ २३ ॥ विवेकवैराग्यादिसमस्तीं ॥ सांगोंपाठविलीविनंती ॥ क
रजोडोनीसमस्तीं ॥ पुढतपुढतीनमनकेलें ॥ २४ ॥ तिहींसत्वरतुह्मा ॥ बोलाऊंपाठविलेंज्ञानात्मा ॥ कार्य
निवेदनाचीक्षमा ॥ करोनीचलावेंसत्वर ॥ २५ ॥ येथेंकार्यसांगोंसकळ ॥ तरीहोईलपाल्हाळ ॥ भेटली
यानिवृत्तीवेल्हाळ ॥ तेसकळनिवेदील ॥ २६ ॥ तरीशीघ्रचीआतां ॥ वेगींचलाजीताता ॥ ऐकूनीज्ञानव
रितता ॥ आनंदेंसींनिघाले ॥ २७ ॥ पुढेंभक्तिभावचमकेवेगें ॥ तयासवेज्ञानआनंदमार्गें ॥ ऐसींआलीं

म.चं. समयोगें ॥ अतियोगेंनिवृत्तीपासीं ॥ २८ ॥ ज्ञानआलेंजाणोनी ॥ निवृत्तीआनंदलीमनीं ॥ मगवेगेंधा अ० 
वोनी ॥ करजोडोनिवंदिलें ॥ २९ ॥ पुढतींआलिंगनदेवोनी ॥ बैसविलेआसनीं ॥ मगतींकुमरेंयेवोनी ॥ ४
॥ २ ॥ चरणींलागोनीभेटती ॥ ३० ॥ पुनःपुन्हानमितीआदरें ॥ प्रेमाचेनीपडीभरें ॥ ज्ञानहीसंतोषेथोरें ॥ पाहेसा
दरअपत्यांसीं ॥ ३१ ॥ तंवज्ञाननिवृत्तीसींबोलें ॥ कवणाकार्याबोलाविलें ॥ कायअवघडअसेमांडिलें ॥
तेंसांगेवहिलेंझडकरी ॥ ३२ ॥ उत्तरऐकोनीज्ञानाचें ॥ निवृत्तीह्मणेतूंनिजमाझें ॥ इच्छिलेंपावविसीसह
जें ॥ ह्मणोनीआगमनतुझेंकरविलें ॥ ३३ ॥ याक्षेत्राचामनराजा ॥ तयाच्याआह्मीदोन्हीभाजा ॥ परीप्र
वृत्तीआधिनजालाराजा ॥ नकरीमाझाआठव ॥ ३४ ॥ तिचाकुमरवडिलमोहो ॥ त्यासीमनेंराज्यदिधलें
पहाहो ॥ यासींकरणेंकायउपावो ॥ तेंसांगाहोआह्मांसीं ॥ ३५ ॥ आणिमाझ्याकुमरींताता ॥ धरिलीराज्या ॥ २ ॥
चीआस्था ॥ प्रवृत्तीपुत्रांतेंआतां ॥ ह्मणतीसर्वथादंडावें ॥ ३६ ॥ ऐसेंत्याकुमरींपाहीं ॥ भाविलेंआहेहृदयीं ॥

तेंतुझामानलेकींनाहीं ॥ हेंलवलाहींसांगापां॥३७॥तरीतुझावेगळाहव्यास॥ करितांवायांचीसोस ॥ आ
तांधरिलीतुझीआस ॥ आज्ञाशिरसाप्रमाण ॥ ३८ ॥ तूंजयाअंगिकारिसी ॥ तयाचींबंधनेंतोडिसी॥
स्वसुखेंठेविसीं॥ स्वानुभवेंसींशेवटीं ॥ ३९ ॥ संतमुनीऋषीश्वर॥ राजेआदीकरोनीथोर ॥ तेतुझेनीपाव
तीपार ॥ ऐसाविचारजाणपां ॥ ४० ॥ ह्मणोनीतुझीगोडीआह्मा ॥ लागलीसेज्ञानोत्तमा ॥ आतांजे
मिळेलधर्मा॥ तेआह्मानिवेदीं ॥ ४१ ॥ ऐकोनीनिवृत्तीवचनें॥ अतिसंतोषपाविजेज्ञानें॥ ह्मणेधन्यध
न्यकर्णे ॥ सानबोलणेंपैतुझें॥ ४२ ॥ तुझ्याकुमरींविचारकेला॥ तोयथार्थ आह्मामानला ॥ तरीभाग्योद
यझाला ॥ फारचांगलाक्षेत्राचा ॥ ४३ ॥ प्रवृत्तीआणितिच्याकुमरी ॥याक्षेत्राचीकेलीबोहरी ॥ जगगो
विलेंअपारभारी॥ मनहीआसेंबहकविलें॥४४॥ आणिकहीदशेंद्रियें॥ लाविलींविषयाचीसोयें॥ नेण
तीकार्याकार्य॥ अन्योन्यपाहेतिहींकेलें ॥ ४५॥ नीतितीहीउल्लंघिली॥ सत्क्रियातेहीबुडाली॥ अवक्रिये

चीचालकेली ॥ भलेह्मणतीयेक्षेत्र्रीं ॥ ४६ ॥ सुबुद्धीनाहींतयापासीं ॥ कुबुद्धीनांदेपरियेसी ॥ नीतीदवडो
नीअवनीतीसीं ॥ पाळिलेंतिसींपैआहे ॥ ४७ ॥ ऐसीतेदुर्जनेठाइंचीं ॥ आठवणनाहींस्वरूपाची ॥ ह्मणो

नीसंगतीतिची ॥ चिळसत्याचीनिजभक्तां ॥ ४८ ॥ तयादेखतांडोळां ॥ मजहीआलाकंटाळा ॥ मगत्यजू
नीतयास्थळा ॥ राहिलोंभलानिजानंदीं ॥ ४९ ॥ आतांबहुतबरवेंजालें ॥ जेंतुह्मीमजबोलाविलें ॥ आ
दरिलेंकामफळाआलें ॥ ऐसेमजदिसताहे ॥ ५० ॥ तरीआजपासोनितुझ्याकुमरीं ॥ राज्यआकळावेंसं
भारीं ॥ मीअसेंसाहकारी ॥ दृढकैवारीपाठिसीं ॥ ५१ ॥ तरीसंतोषातेंहकारा ॥ तयेनीतीतेंपाचारा ॥ अ
वनीतीचाथारा ॥ मोडावाखरानिर्धारें ॥ ५२ ॥ आनंदाघ्यावामान ॥ हरुषअसूंघावाअनुदिन ॥ चिंताहे
दवडोन ॥ दूरदेशींघालावी ॥ ५३ ॥ संतवचनेंपाळावीं ॥ दुष्टबुद्धिनायकावी ॥ संगतीबरवी ॥ दृढधरावी ॥ ३ ॥
साधूंची ॥ ५४ ॥ पाळावीनिरपेक्षता ॥ त्यजावीलोलुप्यता ॥ करुणासर्वांभूतीं आतां ॥ सर्वथापैंअसावी

॥ ५५ ॥ सदांसंतुष्टवसावें ॥ दीनपणेंनधरावें ॥ सुखदुःखीनव्हावें ॥ व्याकुळस्वभावेंकदापी ॥ ५६ ॥ ऐ
सींज्ञानाचींवचनेंऐकोनी ॥ निवृत्तीउल्हासलीमनीं ॥ मीताताआजपासोनी ॥ पावनजगींजाहलें ॥ ५७ ॥
तुजज्ञानासारिखीधुर ॥ मजजोडलाआधार ॥ माझेनेणतेकुमर ॥ तुझ्यावोसंगींघातले ॥ ५८ ॥ ह्मणो
निपुत्रांकरींधरिलें ॥ ज्ञानाचियेहातींदिधलें ॥ आजीपासोनीतुझेजाले ॥ यांसींपाळिलेंपाहिजे ॥ ५९ ॥ ऐ
सेंबोलोनीनिवृत्ती ॥ कुमरांदेईज्ञानाचेहातीं ॥ तेंज्ञानहीअतिनिगुतीं ॥ रंजवीप्रीतीबाळांतें ॥ ६० ॥ तेकु
मरहीआनंदें ॥ सेवितीज्ञानाचींपादारविंदें ॥ वर्ततीत्याचेनीछंदें ॥ तयाचेशब्देंचालती ॥ ६१ ॥ निवृत्तीव
देआतां ॥ राज्यकवण्यापुत्रासींताता ॥ ज्ञानउल्हासेवचनार्था ॥ विचारतत्वताकरितसे ॥ ६२ ॥ धीरहाक
रिलावेगीं ॥ परमार्थतयापाठींलागीं ॥ आनंदतयाच्यासंयोगीं ॥ येतवेगींझडकरी ॥ ६३ ॥ भाववैराग्य
विवेक ॥ विचारनिजबोधसुरेख ॥ तेहीज्ञानासन्मुख ॥ आल्हादेंदेखवैसती ॥ ६४ ॥ भक्तीशांतिक्षमादया

बैसतीजेथेनिवृत्तीमाया ॥ जननीपुढांयेवोनियां ॥ ज्ञानविसावियातेस्थळीं ॥ ६५ ॥ इतुकियासमवेत ॥ ज्ञानविचारकरीत ॥ पाहोंलागलालक्षणवंत ॥ तयापुत्रांतनेटका ॥ ६६ ॥ ह्मणेभावतरीसकळाहुनीव डील ॥ तोयेकेस्थळींचगुंतेल ॥ व्यापकपणेंकेवींवर्तेल ॥ राज्यचालविलकैसेंपैं ॥ ६७ ॥ वैराग्यानाहींहाव ॥ विरक्तत्याचामनोभाव ॥ तोकेवींचालविल अपूर्व ॥ हेराणीवक्षेत्राची ॥ ६८ ॥ विचाराचीएकचीपरी ॥ अहो रात्रविवंचनाकरी ॥ तोकेवीसावरी ॥ राज्यभारयेथींचे ॥ ६९ ॥ विवेकतोवसेविवेकें ॥ त्यासींहेंराज्यनटि के ॥ तरीबोधाराज्यकवतुकें ॥ देतांमजनिकेंवाटतें ॥ ७० ॥ तोसर्वांहूनिधाकुटाहोय ॥ आणिव्यापकत्व तयाबाणलेंआहे ॥ स्वानुभवसुखाचीसोय ॥ तोचीपाहेजाणत ॥ ७१ ॥ सांगतोंतयाचींलक्षणें ॥ संतरूपे कारणें ॥ तेपरिसावींसावधानें ॥ श्रीनाथदासह्मणतसे ॥ ७२ ॥ इतिश्रीमनश्चंद्रबोध ॥ निवृत्तीज्ञानानुवा द ॥ ऐकतांतुटेसंबंध ॥ प्रवृत्तीचामनासीं ॥ ७३ ॥ इतिश्रीमनश्चंद्रबोधेचतुर्थोध्यायसंपूर्णमस्तु ॥ ४ ॥

श्रीगणेशायनमः॥ ज्ञानह्मणेसकळिका ॥ तुह्मीसावधानऐका॥ जोनिजबोधनेटका ॥ त्याचेगुणवाणि
तों ॥ १ ॥ तोसगुणत्वेंअतिशांत ॥ पूर्णबोधसदोदित॥ सारिखेंचिभासेसमस्त॥ रंकआणिसमर्थतया
॥ २ ॥ आजानुबाहुहास्यवदन॥ आसनींदृढउन्मीलितनयन ॥ योगयुक्तराज्यलक्षण ॥ आनंदेंसदांडु
ल्लत॥ ३ ॥ स्वरूपेंसाजिरासंपूर्ण॥ सर्वलक्षणेंपरिपूर्ण॥ हरिहरब्रह्मादिसुरगण ॥ मानितीजाणतयासीं
॥ ४ ॥ आपपरहाभास ॥ नमनींजयाचेंमानस॥ सर्वस्वेंउदास॥ विरक्तबहुवसस्वभावें॥ ५॥ अद्वैताचा
पुतळा॥ ऐकभावेंदिसेवोतिला॥ साधुजनासींभला ॥ विसावाचांगलात्याचा॥ ६ ॥ चहूंवेदांचाजाण
ता॥ चाऱ्हीअवस्थाभोगोनिअभोक्ता॥ विकाराविरहितसर्वथा॥ पाहणेपाहतांदृश्यपणे॥ ७॥ चहूंपुरुषा
र्थांचीजाणेखूण ॥ चाऱ्हीमुक्तींसींभोगीसंपूर्ण ॥ नवलत्याचेंअकर्तेंपण॥ बोधजाणआलेसे ॥ ८॥तत्वम
सीमहावाक्याचाअर्थ॥ तोचीएकजाणेसमर्थ॥ आणिजाणपणेंविरक्त॥ उदासचित्तजयाचें॥ ९॥स्व

रूपाचें अनुसंधान ॥ निरंतर असे जाण ॥ नाना विकारीं मन ॥ न गुंते तयाचें ॥ १० ॥ कर्माकर्म विचार ॥ तें ज
याब्रह्मसाचार ॥ विकाराचा अंकुर ॥ मनीं साचार न दिसे ॥ ११ ॥ कर्मीं ब्रह्माची प्रचिती ॥ ऐसी जयाची निश्च
 ळमती ॥ बोधलेपणें चित्तवृत्ती ॥ ढळेना कदा जयाची ॥ १२ ॥ जन हेची जनार्दन ॥ ऐसें जयाचें अखंड
ध्यान ॥ तया पासीं अनुमान ॥ आन जाण असेना ॥ १३ ॥ पूर्ण अष्टकाचा जाणता ॥ साही विकाराचा ज्ञा
ता ॥ कवणे विषयीं अहंता ॥ न धरी सर्वथा मानसीं ॥ १४ ॥ पांचांही विषयाचा देखणा ॥ इंद्रियाच्या जा
णेखुणा ॥ परी कवणा विषीं कल्पना ॥ न धरी जाण मानसीं ॥ १५ ॥ नित्य चौथी अवस्था ॥ वसे जयाची
याचित्ता ॥ अष्टौ प्रहर मज पाहतां ॥ होय भोक्ता उन्मनीचा ॥ १६ ॥ जीवाशिवाची जाणेखूण ॥ गुणत्र
याचें नाहीं बंधन ॥ त्रिविध ताप तयालागून ॥ न बाधिती जाण सर्वथा ॥ १७ ॥ वेदांत शास्त्रीं कुशळ गह 
न ॥ येराही शास्त्रीं अति निपुण ॥ परऐहिकाची भावना ॥ येकपणा सर्वत्र ॥ १८ ॥ वृत्तावृत्तीं सकळ ॥ चि

द्रूपभासेकेवळ ॥ मनींसंकल्पाचाविटाळ ॥ अळुमाळवसोनेदी ॥ १९ ॥ कवणमीमजभवकैचा ॥ मी
इष्टयासकळांचा ॥ मजमाजीभेदाचा ॥ पदरसाचानदिसेची ॥ २० ॥ ऐसातोनिजबोध ॥ बोधलेपणेसु
बोध॥ आनंदरूपस्वानंद ॥ आनंदकंदसुखाचा ॥ २१॥ सकळभोगूनीअभोक्ता॥ सर्वहीकरोनीअकर्ता॥
विश्वदेखेदेखतां॥तद्रूपताआत्मपणें॥ २२॥विश्वींविश्वात्मापरिपूर्ण॥अनुभवेजाणखूण ॥ ऐसीस्थितीसं
पूर्ण ॥ जाणखूणतयाची ॥ २३ ॥ संतविरक्तमहानुभाव ॥ जाणतीबोधाचागौरव॥ तिहींलोकींअपूर्व ॥
ऐसापाहतांनदेखों ॥ २४॥ ऐसासुलक्षणींसाजिरा ॥ तेजोमयज्ञानाचाहिरा ॥त्यावेगळासोयरा॥आणि
कदूसरानदिसे ॥ २५॥ तरीराज्यबोधाघ्यावें ॥ ऐसेंघेतलेंमाझ्याजीवें ॥ तुह्मामानलेंकींसांगावें ॥ मजभा
वेंझडकरी॥ २६॥ ऐसेंज्ञानअनुवादतां ॥ संतोषजालासमस्तां ॥ निवृत्तीह्मणेबरवेंआतां ॥ जेंआपणयो
जिलेतें ॥ २७॥ धीरआनंदपरमार्थ ॥ तयामानलीज्ञानाचीमात॥ विवेकवैराग्यादिसमस्त ॥ हर्षयुक्त

म.चं. मानसीं ॥ २८ ॥ तंवपरमार्थअनुवादेंचांग ॥ ह्मणेहानहोतांसपत्नीकसांग ॥ तंवहाबोधराज्यायोग्य ॥ अ० ५
नव्हेचांगदातारा ॥ २९ ॥ तरीविवाह्याचाआधीं ॥ करावाजीज्ञाननिधी ॥ मगबोधानिजबोधीं ॥ रा
॥ २ ॥ ज्यपदींबैसवा ॥ ३० ॥ ऐसेंपरमार्थबोले ॥ तेंज्ञानासहितसकळामानलें ॥ मगतेचकाळींवहिले ॥ पाहूं
लागलेनोवरी ॥ ३१ ॥ तंवसकळविचारिती ॥ नोवरीचीकैसीकीर्ती ॥ योगियाचीविश्रांती ॥ सहज
स्थितीसदाकाळीं ॥ ३२ ॥ अबोलपणेंशाहणीं ॥ अखंडतळपतसेआसनीं ॥ विरक्ताचीस्वामिनी ॥ बो
धालागोनीअतिपाडे ॥ ३३ ॥ तीआनंदाचीकन्याबरवी ॥ चौकुमरींधाकुटीहीपाचवी ॥ नावेंतरीबरवीं ॥
सांगोस्वभावेंतुह्मासीं ॥ ३४ ॥ जातकवर्णिलेंब्रह्म्यानी ॥ नामनिघालेंउन्मनी ॥ तियेच्याचौघीबहिणी ॥
त्याश्रवणींऐकापां ॥ ३५ ॥ जागृतीस्वप्नसुषुप्ती ॥ चौथीतुर्याविख्याती ॥ याधाकुटीगुणवंती ॥ तीमहाशक्ति ॥ २ ॥
उन्मनी ॥ ३६ ॥ तीकन्यासुलक्षणीगुणवंत ॥ बोधासींआहेघटितार्थ ॥ आतांपाहोनीयामुहूर्त ॥ लग्नत्वरि

तलावावें ॥ ३७॥ आनंदातेंज्ञानबोलत ॥ ह्मणेतुमचीकन्यागुणवंत ॥ बोधाकारणेनिश्चित ॥ द्यावीत्वरि
तयेकाळीं ॥३८॥ आधींचआनंदामनींहोतें ॥ उन्मनीद्यावीबोधातें ॥ तेंचिघडलेंयेथें ॥ ज्ञानेंअवचितेंमा
गीतलें ॥ ३९ ॥मगलग्नपाहूनीत्वरित॥ मधुपर्कषोडशेंकरित ॥ स्वानुभवहेंचिकुळदैवत ॥ पूजाकरितषोड
शीं॥४०॥यानंतरेआनंदत्वरित॥उन्मनीसींहातींधरित॥ज्ञानउभेंसतत॥ बोधजेथंत्यापाठीं ॥४१॥भक्ति
भावें अंतरपाटधरिला॥ देखोनीपरमार्थआनंदला ॥ तंवसावधानधीरेंकेला ॥ मंगळदायक ॥ ४२ ॥
वैराग्यें अक्षताघेतलीया॥ संतोषेंमाथाघातलीया॥ तुर्यासाक्षीआलिया॥ कुरवंडीतयाघेऊनी॥ ४३॥
विश्रांतीआनंदाचीराणी ॥ तीधारघालीतत्क्षणीं ॥ धृतीश्रुतिसुवासिनी ॥ सभोंवत्यायेवोनीउभ्या
॥ ४४ ॥ येथेंनानाध्वनीवाजंतरें॥ ध्यानाचेंनिशाणसाजिरें॥ एकत्याचेंमनमुरे॥नादभरेब्रह्मांडी॥ ४५॥
ऐसेंलग्नझालियावरी॥ अंतरपाटविवेककाढीलवकरी ॥ मगसहजाचीयाबोहल्यावरी ॥ तींवधूवरेंबैस

म.चं. ती ॥ ४६ ॥ स्वसंवेद्याचाउदोकार ॥ निर्धारकेलाअपार ॥ तेणेंनिवृत्तीसुंदर ॥ देखोनियाउल्हासली ॥ अ०
॥ ४७ ॥ अभिमानाचेंकेलेंलोण ॥ तेंसांडिलेंओवाळून ॥ आश्चर्यलज्जाहोमकरून ॥ संपादूनसांडिला ५
॥ ३ ॥ ॥ ४८ ॥ कंकणबांधिलेंकरीं ॥ स्वानुभवाचीसाजिरी ॥ पदरींगांठपडलीएकसरी ॥ ऐक्यभावाचीवधूव
रां ॥ ४९ ॥ वृत्तिश्रुतीसुवासिनी ॥ आणिनिवृत्तीजननी ॥ शेषपाटभरतीघेऊनी ॥ अक्षयवाणेसंभ्रमें ॥
॥ ५० ॥ चवथीवाचाततृक्षणीं ॥ परतोनिगेल्याकुरवंडीकरोनी ॥ स्वप्नजागृतीमेहुणी ॥ त्यालागुनीराहि
ल्या ॥ ५१ ॥ तुर्याचवथीविख्यात ॥ उन्मनीसवें आवडत ॥ साक्षित्वेंदोघांप्रत ॥ उभीजगतपाहतसे ॥
॥ ५२ ॥ तुर्यचेनिसांगातें ॥ तींवधूवरेंशोभते ॥ आणिदेखतांवधूवरातें ॥ तुर्यातिथेंउल्हासे ॥ ५३ ॥ तेथें
विधिनिषेधदोन्ही ॥ तेनातळतीअसोनी ॥ दुश्चितपणेंनिघोनी ॥ गेलेपळोनीतेकाळीं ॥ ५४ ॥ चाऱ्हीमु ॥ ३ ॥
क्तीचाऱ्हीदिवस ॥ चतुर्थसंपादिलासावकाश ॥ सत्वगुणाचेसाडेसौरस ॥ जालेबहुवसआनंदें ॥ ५५ ॥

संपादिलीलग्नसिद्धी ॥ आरंभीलाविहितविधी ॥ वेदांताचेराजबिदी॥वधूवरेंबुद्धिमिरविली ॥५६॥ सां
ख्याचागृहप्रवेश ॥ तयाकिलासावकाश ॥ द्वैतमाद्याहोत्याबहुवस॥त्यासमरसजालिया ॥ ५७ ॥ भेदा
चाभासतुटला ॥ एकत्वेंजोडायेकजाला ॥ समाधिस्थराहिला ॥ जाणतीकळाअनुभवी ॥ ५८ ॥ मगसं
तोषतत्क्षणीं ॥ घेंडानाचविलाविवाहांगणीं ॥ संतवऱ्हाडीवोवाळणी ॥ विधिनिषेधघालिती ॥ ५९ ॥
यारीतिविवाहजालियावरी ॥ अंगेसींजडेनोवरी॥ बोधनविसंबेक्षणभरीं॥जेथेंबोधतेथेंउन्मनी ॥६०॥
ऐसीउन्मनीसगुण ॥ बोधागमनींगमन ॥ बोधाआसनींआसन॥ शयनींशयनयेकची ॥ ६१ ॥ त्याए
काविणएकासीं॥ क्षणभरींनगमेदुजयासीं ॥ उपमानदिसेकैसी॥ यादोघांसींविश्रांती ॥ ६२ ॥ जेथें
योगीयासींविश्रांती ॥ हींदोघेंतेथेंबसती ॥ रिद्धिसिद्धिदास्यकरिती ॥ स्वर्गसुखटाकितीओंवाळूनी ॥
॥ ६३ ॥ आतांबहुबोलतांविस्तार॥ ग्रंथासहोतोपस्सर ॥ पुढीलकथेचाप्रकार ॥ अतिसादरएकावा ॥

॥ ६४ ॥ बोधजालासपत्नीक ॥ वेगींकराराज्याभिषेक ॥ तंवह्मणेआवश्यक ॥ निवृत्तीकौतुककरीतसे ॥
॥ ६५ ॥ बोधामंगळस्नानआदरें ॥ करविलेंज्ञानेश्वरें ॥ तेथेंअनुहतगजरें ॥ मंगळतुरेंवाजती ॥ ६६ ॥
 राज्याभिषेकझाला ॥ देवींपुष्पवर्षावकेला ॥ बोधसिंहासनीबैसविला ॥ बरवेमुहूर्तें ॥ ६७ ॥ राज्यींबै
सविलीयावरी ॥ तंवज्ञानकायकरी ॥ राजापूजिलाअळंकारी ॥ कवणेपरीऐकपां ॥ ६८ ॥ पूर्णत्वाचें
आसन ॥ व्यापकत्वचिरप्रधान ॥ सर्वबीजत्वजाण ॥ करीपूर्णमहाफळ ॥ ६९ ॥ कारणत्वमुगुटशिरीं ॥
अखंडकुंडलेंसाजिरीं ॥ सर्वधारणत्वभारी ॥ पदकुसरीमिरवे ॥ ७० ॥ पावनत्वविभुतीभाळीं ॥ अशो
कतांबूलमुखकमळीं ॥ चंदनाचीउटीदिधली ॥ अंगाच्याआर्द्रत्वाची ॥ ७१ ॥ अनर्घ्यत्वतेंसुवर्ण ॥
त्याचेंसर्वांगींभूषण ॥ मुद्रिकाहस्तींकंकण ॥ नानावर्णअळंकार ॥ ७२ ॥ अमृतत्वतेंअमृतींचीवाटी ॥ ॥ ४ ॥
समीपभासेगोमटी ॥ निर्मळत्वमाळाकंठीं ॥ मुक्तिपरिपाठीसोन्याची ॥ ७३ ॥ अच्छेदत्वतेंवज्रअंगीं ॥

जेंकदांनवचेंभंगीं ॥ चैतन्यत्वसर्वांगी ॥ प्रभातवेगींवोपिलें ॥ ७४ ॥ जीवनत्वहेंनानारस ॥ तेणेंपुष्टीहो
यसर्वांगास ॥ अजत्वतेंपरियेस ॥ विद्यासौरसप्रचीती ॥ ७५ ॥ महाजडितआभरण ॥ तेअनर्घ्यत्वसंपू
ण ॥ स्वप्रकाशकत्वदर्शन ॥ स्वरूपसंपूर्णपहावया ॥ ७६ ॥ ज्योतीरसत्वअग्नीसिखा ॥ निरंतररायासन्मुख
देखा ॥ अक्लेद्यत्वतेंऐका ॥ कळासुंदरासुरेखा ॥ ७७ ॥ सर्वसमृद्धिवशोभत ॥ लक्षुमीगजगजांत ॥ तेंदे
खतांचित्त ॥ उल्हासतअपार ॥ ७८ ॥ ॥ परापरत्वतेआयुध ॥ कृपाळुत्वओढणनिबंध ॥ ऊर्ध्वपदत्व
विशद ॥ चामरशुद्धवरीउडे ॥ ७९ ॥ असंगत्वसुरेख ॥ तेंमेघडंबरकीर्तिमुख ॥ गुढियातोरणेअनेक ॥ ते
रायासन्मुखउभविती ॥ ८० ॥ यापरीतेंज्ञानमहाकारण ॥ देहींचाअंशकाढून ॥ राजागौरविलासंपूर्ण ॥
स्वमतीजाणआपुलिया ॥ ८१ ॥ ओंकारमुद्रासाजिरी ॥ दिल्हीरायाबोधाकरीं ॥ तेणेंबोधराजाअवधा
री ॥ राज्यपदभारीपावला ॥ ८२ ॥ तीमुद्रासकळांचेशिरावरी ॥ अतिशोभतसेभारी ॥ तेणेक्रियाचाले

साजिरी ॥ तेजाणतेपरीअनुभवीं ॥ ८३ ॥ येथीलगोडीसंतजाणती ॥ तेबोधाचेसभेबैसती ॥ येरानाक
ळेयेथीलस्थिती ॥ जेअहंमतीगुंतले ॥ ८४ ॥ सकळभूतजात ॥ ओंकारमुद्रांकित ॥ ऐसेंजाणावेंनिभ्रां
॥ ५ ॥ त ॥ शुद्धचित्तेबुधजनीं ॥ ८५ ॥ ओंकारसकळासींमूळ ॥ ह्मणोनीमुद्राकेवळ ॥ तीबोधाकरींविमळ ॥ ज्ञा
नेंतात्काळघातली ॥ ८६ ॥ मगपुनरपीतेनिवृत्ती ॥ अनुवादेज्ञानाप्रती ॥ ह्मणेताताविनंती ॥ ऐकासादर
एकचित्तें ॥ ८७ ॥ तरींप्रधानत्वतुह्मीं ॥ अंगींकरावेंस्वामी ॥ बोधरक्षकपराक्रमी ॥ समागमींठेवावें ॥ ८८ ॥
ऐकोनीनिवृत्तींचेंवचन ॥ प्रधानत्वअंगीकारीज्ञान ॥ बोधापाठींसावधान ॥ महावीरठेविले ॥ ८९ ॥ भा
ववैराग्यविचार ॥ विवेकबळियाढासुंदर ॥ हेचौघेमहावीर ॥ बोधाधीरसंग्रामीं ॥ ९० ॥ धीरपरमार्था
दिक ॥ आणिआनंदनिःशेषसुरेख ॥ केलसभानायक ॥ ज्ञानेंदेखतयेकाळीं ॥ ९१ ॥ भक्तीघालीघरटी ॥ ॥ ५ ॥
शांतीबैसेबोधानेटी ॥ क्षमादयाराजेंद्रापाठीं ॥ उभ्यासमदृष्टिसावध ॥ ९२ ॥ मगपुनरपीतेंज्ञान ॥ देश

दुर्गेंदेवांटून ॥ तेंऐकासावधान ॥ एकाग्रमनेंकरोनी ॥ ९३ ॥ सकळराज्यबोधाचें ॥ स्वामीत्वज्ञानप्रधा
नाचें ॥ एकनिष्ठापट्टणसाचें ॥ भावशिवाचेंदिधलें ॥ ९४ ॥ तयानंतरेंवैराग्यासीं ॥ उदासनगरीदिधली
कैसी ॥ तेणेपैंतयासीं ॥ सुखपरियेसींवाटलें ॥ ९५ ॥ नित्यअनित्यपुरेंपट्टणें ॥ विवेकविचाराकारणें ॥
दिधलींतयाज्ञानें ॥ शुद्धमनेंआवडोनी ॥ ९६ ॥ धीरनिश्चयोऐसादेश ॥ दिधलाहोबहुवस ॥ सत्याचेंनगर
रूपस ॥ तेंपरमार्थासअर्पिलें ॥ ९७ ॥ आनंदामहानंदपुरी ॥ दिधलीहोसाजिरी ॥ हर्षसंतोषातेंअवधा
री ॥ सहजपट्टणभारींदिधलें ॥ ९८ ॥ मगतयाज्ञानें ॥ विश्वरूपअंगिकारणें ॥ नवविधनवगुणें ॥ तींग्रा
मेजाणभक्तिचीं ॥ ९९ ॥ शांतीसनिश्चळतानगरी ॥ क्षमादयासुंदरी ॥ भूतकृपाकरी ॥ दिधलीबरीतया
तें ॥ १०० ॥ ऐसींदेशदुर्गेंसकळां ॥ ज्ञानेंदिधलींतयेवेळां ॥ तेंदेखोनीयाडोळां ॥ निवृत्तीबाळाउल्हासे ॥
॥ १०१ ॥ सानंदजालाठाईंठाईं ॥ तयेप्रवृत्तोचालेखानाहीं ॥ सिद्धहोऊनीसर्वंही ॥ दंडकाहींझणताती ॥

॥ २ ॥ यापरीबोधराज्याधिकारी॥ ज्ञानप्रधानआहेसाहकारी ॥ ऐसेंदेखिलेंहेरीं॥ दुराचारीमोहाच्या 
॥ ३ ॥ मोहासमीपआतां॥ दूतसांगतीलवार्ता॥ तीचसावधऐकाकथा॥ म्हणेश्रीनाथदाससंतांचा॥ ४॥



इतिश्रीमनश्चंद्रबोध॥ निवृत्तिज्ञानानुवाद॥ बोधादिधलेंराज्यपद ॥ निरंजनीचेंअक्षई॥ १०५॥ ॥इ
तिश्रीमनश्चंद्रबोधंपंचमोऽध्यायरसाळहा॥ ५॥ ॥ ७॥ ॥ ७॥ ॥ ७॥ ॥ ७॥



श्रीगणेशायनमः॥ तयामोहाचेदूत ॥ तेगुप्तहोतेविचरत ॥ तिहीं देखिलें समस्त ॥ वर्तमाननिवृत्तीचें॥ १॥
मगतेलवलाहीं आले ॥ राजभुवनावेगीं पावले ॥ तंवभद्रीं होतेंबैसले ॥ मोहोराजसंभारें ॥ २ ॥ समीपप्र
धानअहंकार ॥ गर्वनिधीचेंभांडार ॥ आणिकामक्रोधमदमत्सर ॥ बळीअतिशयदाटुगे ॥ ३ ॥ ऐसीस
भाघनवटलीअपार ॥ दूतकरितीनमस्कार ॥ प्रवृत्तीपुसेकांहीं अपूर्व ॥ देखिलेंसांगादूतहो ॥ ४ ॥ ह्मणती
निरंजनींनिवृत्ती ॥ तेथेंदेखिलीअपूर्वस्थिती ॥ पांचपुत्रतियेप्रती ॥ आणिनिश्चितींचारकन्या ॥ ५ ॥ भ
क्तिशांतीक्षमादया ॥ त्याधाकुटेपांचपुत्रस्वामियां ॥ भाववैराग्यविचारविवेकराया ॥ धीरपाहानिज
बोध ॥ ६ ॥ तयाचेंसंरक्षण ॥ करीमनाचीबुद्धिबहिण ॥ तयाचेंनिवृत्तीवरीमन ॥ असेजाणप्रेमेंसीं ॥ ७ ॥
परमार्थबंधूनिवृत्तीचा ॥ तोहीप्रतिपाळकरीत्यांचा ॥ आणितेनिवृत्तिमातेचा ॥ स्नेहसाचाबहुत ॥ ८ ॥
तिचेकुमरप्रबुद्धझाले ॥ भक्तिभावपाठऊनीज्ञानां आणिलें ॥ बोधाराज्यदिधलें ॥ ज्ञानें अंगिकारिलेंप्र

धानत्व ॥ ९ ॥ धीरपरमार्थ आनंदादिक ॥ केलेसभामंडळिक ॥ वैराग्यविचारविवेक ॥ तेदेखापाठिराखे
॥ १० ॥ ज्याघरींभक्तीचीसत्ता ॥ तेथेंविवेकजाणतत्वतां ॥ विचाराचीसबळता ॥ भावदृढतावैराग्यासीं
॥ ११ ॥ तेथेंधीरतोबळकट ॥ कवणानाकळेअधट ॥ त्यावरीज्ञानसुभट ॥ पाहतांमुगुटसकळांचा ॥ १२ ॥
तेथेंआनंदवावरे ॥ हर्षसंतोषेंविचरे ॥ तेणेंनिवृत्तीसींबळपुरे ॥ अतिधैर्यझालेंअसें ॥ १३ ॥ आनंदाची
कन्याउन्मनी ॥ तीभार्याबोधालागुनी ॥ पाहतांत्यांचासमुदायजनीं ॥ सकळांहोनीदृढदिसे ॥ १४ ॥ ऐसें
दूतबोलतांपहाहो ॥ दुश्चित्तसभेमोहोरावो ॥ देखोनिसभेचाअभिप्रावो ॥ मगनिर्वाहोबोलती ॥ १५ ॥
मीअहंकारदृढअसतां ॥ मगबोधआणिज्ञानाचीकायकथा ॥ तींमजपुढेंनटिकतीतत्वतां ॥ मजपाहतां
चीपळतीपैं ॥ १६ ॥ अनिवारमाझेशर ॥ कोणसाहेरणरंगधीर ॥ तेथेंबापुडींनिवृत्तीकुमर ॥ त्यांसींवारं
वारदंडीन ॥ १७ ॥ अज्ञानम्हणेहेंजगत्र ॥ म्यागोविलेंअसेसर्वत्र ॥ पाडिलास्वरूपाचाविसर ॥ जीवदशे

साचारभुलविली ॥ १८ ॥ माझीअज्ञानशक्तीचांग ॥ तिणे अविद्येचालाविलालाग ॥ हातरीतुझाप्रसंग
ठाउकाचिअसे ॥ १९ ॥ दुश्चित्तराजासभानायक ॥ तयास्वस्थकरितीप्रधानऐक ॥ तैसेअहंकारादिक
देतीपुष्टीबळ ॥ २० ॥ प्रधानधीरझालाविशेख ॥ तंवकामक्रोधादिसकळिक ॥ बोलतीप्रतापकौतुक ॥
रायाऐकआमुचीप्रौढी ॥ २१ ॥ मगकामवदेउन्मत्तपणें ॥ रायाचिंतातुरनहोणें ॥ हाकेनेंत्रैलोक्यपाळ
णें ॥ सिद्धसाधकममभेणेदडती ॥ २२ ॥ क्रोधवदेशब्दवाडे ॥ विवेकायेऊंनेदीपुढें ॥ विचाराचीफो
डीनजाभाडें ॥ वैराग्यवेडेंपळवीन ॥ २३ ॥ दंभमदमत्सरलोभद्वेषभ्रम ॥ बोलतीआपलालेपराक्रम ॥
आमुचाअसतांआराम ॥ त्याचाविरामहेंसत्य ॥ २४ ॥ ऐसाआपलालापुरुषार्थ ॥ रायासींबोलतीसमर्थ
ऐकोनीआनंदपावलेंबहुत ॥ अंतःकरणमोहाचें ॥ २५ ॥ तयाउपरीमाताप्रवृत्ती ॥ सहाकन्याधरूनीहा
तीं ॥ मगह्मणेमोहाप्रती ॥ चिंताचित्तींनकरावी ॥ २६ ॥ माझीनेणसींमाया ॥ हेंजगआचरेमाझीक्रिया

येवढेंसामर्थ्यंकरावया ॥ मीरंकरायागोविलें ॥ २७ ॥ शास्त्रेंमाझींसोयचालती ॥ पुराणेंमाझेगुणगा
ती ॥ मीमूळअसेंनिगुती ॥ आदिअंतींचराचर ॥ २८ ॥ मुख्यब्रह्मऐसेंऐकिलें ॥ तेंहीम्यापुरुषत्वाआणिलें
अवतारनानाझाले ॥ तेगुंतलेमाझेनी ॥ २९ ॥ मीत्रैलोक्याव्यापक ॥ वेडाविलाब्रह्मादिक ॥ तेथेंनिवृत्ती
आणिकोणीएक ॥ मीअवश्यकमानीना ॥ ३० ॥ तरीतेनिवृत्तीकायसी ॥ मुख्यनावडेरायामानसीं ॥ त
येसींधरोनीकेशीं ॥ गुडघेवरीमारीन ॥ ३१ ॥ मगतीबाळेंतयेचीं ॥ पळोनीजातीआपणची ॥ तेथेंज्ञाना
चीरुची ॥ तेअवश्यचीनासेल ॥ ३२ ॥ प्रवृत्तीसरलीबोलोनी ॥ तंवकन्याउठिल्याराक्षसीणी ॥ मोहाऐके
निर्वाणीं ॥ उत्तरेंकानींआमुचीं ॥ ३३ ॥ आशाह्मणेम्यागोविलें ॥ संतांमहंतांवेडलाविलें ॥ कोणीनाहीं
उरलें ॥ मगबोलिलेंतृष्णेनें ॥ ३४ ॥ त्रैलोक्यसदाअसंतुष्ट ॥ माझेंकरणेंअचाट ॥ वासनाह्व्यासकष्ट ॥
म्यावरिष्ठगोविलें ॥ ३५ ॥ आणिकदोघीजाणा ॥ मजमागेंइच्छाकल्पना ॥ त्याहीतरीयात्रिभुवना ॥ वे

ढाजाणघातलासे ॥ ३६ ॥ ऐसेसमस्तांचीयेवचनीं ॥ मोहद्दढावलामनीं ॥ ह्मणेराज्यराज्याभिधानी ॥ म
जहूनीदुजानसे ॥ ३७ ॥ मगमोहहर्षयुक्ती ॥ प्रधानासींवदेपुरुषार्थी ॥ ह्मणेमींएकलाचिस्वतंत्री ॥ त्रिभु
वनांतनाकळे ॥ ३८ ॥ मीमोहकरितांराणिव ॥ मोहानेंगोविलेब्रह्मदेव ॥ तरीतेंकैसें अपूर्व ॥ सांगोसर्वतु
ह्मांसीं ॥ ३९ ॥ मुख्यविभूतेवेढाघातला ॥ तोभक्तांचेमोहेंगुंतला ॥ कांहींसांगोपायाबोला ॥ अन्यथाव
हिलाअसेना ॥ ४० ॥ भक्तांचेमोहेंगुंतलात्वरित ॥ एकाचेद्वारींतिष्ठत ॥ एकाचीसेवाकरित ॥ लाजबहुत
सोडोनी ॥ ४१ ॥ एकाच्यागाईराखेआवडी ॥ एकाचींधुतसेघोडीं ॥ नानाआपदादिकाढी ॥ लवडसव
डीएकासीं ॥ ४२ ॥ एकादेतवस्त्राचेभार ॥ एकाद्रव्य ओपीअपार ॥ एकाचेचुकवोनीघोर ॥ एकासमोर
लाडका ॥ ४३ ॥ तोतरीपाहतांनिर्गुण ॥ भक्ताकारणेजालासगुण ॥ ऐसेंमाझेंविंदान ॥ तेंसकळजनजा
णती ॥ ४४ ॥ देवऋषीगणगंधर्व ॥ यक्षराक्षसमानव ॥ म्यागोविलेसर्व ॥ तेराक्षसमाझेनी ॥ ४५ ॥ एर

म. चं. जनाचाकवणलेखा॥तेतंव माझेंअंकितऐका ॥ स्थावरजंगमादिसकळिका॥म्यागोऊनिपाडिलें॥४६॥ अ० ६

वडीलआमुचापितामन ॥ तोचिजालामजआधिन ॥ तेथेंनिवृत्तीचेनंदन ॥ कोणतींदिनबापुडीं ॥ ४७॥

॥ ३ ॥ महापुरुषार्थसांगेअगाध ॥ येशवीरासांगेअसासावध ॥ निवृत्तीपुत्रासींविरुद्ध॥ थोरविशद्आचारा

॥ ४८ ॥ ऐसेंरायाचेंउत्तर ॥ ऐकोनीकामक्रोधअसुर ॥ वोजावलेमहावीर ॥ शस्त्राधारसमभारें॥ ४९ ॥

त्याचीदेखोनीआंगवन ॥ राजाप्रधानासींकरीवचन ॥ ह्मणेयातेंकांहींदेणें ॥ वेगींफोडाभांडारें ॥ ५० ॥

आतांद्रव्यवाटिती ॥ तीऐकावीविल्पत्ती ॥ श्रीनाथदासंसंतांप्रती॥ यथामतीबोलत॥ ५१ ॥ इतिश्रीमनश्चं

द्रबोध ॥ प्रवृत्तीमोहअनुवाद ॥ निवृत्तीचाउच्छेद॥ नामषष्ठोऽध्यायहा ॥ ५२ ॥ ॥ इतिश्रीमनश्चंद्रबो

धेषष्ठोऽध्यायः॥ ६ ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥ ३ ॥

श्रीगणेशायनमः॥ ऐकोनिरायाचीगोष्टी॥ सर्वेचीअज्ञानउठी ॥ विषयांचींभांडारेंउठाउठीं ॥ फोडोनि
वांटीतेकाळीं॥ १॥ आहारमैथुननिद्रा॥ आणिकविषयअसतीअवधारा ॥ मितनाहींभांडारा॥ वांटि
तांसैरानसरतीच॥ २॥ आहारदिधलाक्रोधा ॥ निद्रासमर्पिलीमदा ॥ मैथुनाच्याछंदा॥ कामासर्वदा
दिधलें ॥ ३ ॥ दंभाअभयदिधलेंपरियेसा ॥ लोभाहातींलाविलीहिंसा ॥ मत्सरादिधलीकर्कशा ॥ प्रपं
चासींअसत्य ॥ ४ ॥ अहंकारादिधलागर्व ॥ अज्ञानेंघेतलीमाव ॥ भ्रमाजवळीअपूर्व ॥ अवक्रिया
दिधली॥ ५॥ ऐसेबहुविषयआणोन ॥ सकळांदिधलेवांटोन॥ विषयसुखेंअनुदिन ॥ कांहींजाणनमा
निती ॥ ६ ॥ द्रव्यहातासींआलें ॥ तेणेंकामक्रोधसुखावले ॥ मगसंन्नधकरूंलागले॥ आपलालेंदळ
भार ॥ ७॥ ठाईंठाईंसमस्त ॥ सावधझालेप्रवृत्तिसुत॥ आपलालेदळभारेंगर्जत॥ अतिउन्मत्ततेकाळीं
॥ ८ ॥ इतुकासमारंभझाला॥ परीमनराजाअसेउगला ॥ तोकायकरीलवेडावला॥ बहुगोंविलाप्रवृ

त्तीनें ॥ ९ ॥ तंवनिवृत्तीदूतपावले ॥ तिहींबोधाजोहारिलें ॥ मगसांगोंआरंभिलें ॥ कर्तव्यरचिलेंनिवृत्ती
चें ॥ १० ॥ बोधराजानिवांत ॥ दूतांचींवचनेंऐकत ॥ तंवदूतह्मणतीसावचित्त ॥ सांगतोंमातपरियेसा
॥ ११ ॥ बोधाराज्यींस्थापिलें ॥ तेंप्रवृत्तीसुतींऐकिलें ॥ मगतिहींहांकारिले ॥ कुंजरमातलेकामक्रोध
॥ १२ ॥ त्यांसींदिधलेंअमितभांडार ॥ सन्नद्धकरविलेदळभार ॥ तुह्मासींभिडावयाकुंजर ॥ झालेअसु
रसिद्धपैं ॥ १३ ॥ अहंकारप्रधान ॥ प्रपंचबळेंउन्मत्तपूर्ण ॥ तुमच्यादळभाराचेंगणन ॥ सर्वथाहीनधरि
ती ॥ १४ ॥ तरीयासींविचारकैसा ॥ निवृत्तीविनवीज्ञानेशा ॥ तुझाआहेभरंवसा ॥ तुजसर्वभारघालि
तों ॥ १५ ॥ करुणाउत्तरऐकोनी ॥ ज्ञानअनुवादेवचनीं ॥ ह्मणेप्रवृत्तिपुत्रांचेंमनीं ॥ भयकांहींधरूंनका
॥ १६ ॥ मीअखंडसमीपअसतां ॥ तुह्मीकांहींनकरिजेचिंता ॥ मीएकलाचीतत्वतां ॥ ख्यातीसर्वथाला
वीन ॥ १७ ॥ मीअज्ञानातेंकरीनदूर ॥ अहंकाराचाकरीनसंव्हार ॥ माझेकरींजाणसाचार ॥ ज्ञानश

खेंतिखत्वें ॥ १८ ॥ तुझेकन्यापुत्रसबळ ॥ त्यांचेंयांसींनचलेषळ ॥ हानिश्चयकेवळ ॥ तुझीं अपत्येंजाण
ती ॥ १९ ॥ भावादिकहीमहावीर ॥ विवेकवैराग्यादिथोर ॥ त्यांसींत्यांचानचलेबळात्कार ॥ हानिर्धार
जाणतूं ॥ २० ॥ सर्वोत्तमभजनसार ॥ मजपासींअसेनिरंतर ॥ श्रीगुरुवचनहीसादर ॥ ऐसेंउत्तरबोल
ताझाला ॥ २१ ॥ तंववैराग्यह्मणेमाते ॥ मीएकलादंडीनत्यांतें ॥ तीर्थयात्रापलाटणकरित ॥ मींत्यातें
फिरवीननिश्चयें ॥ २२ ॥ मजवैराग्याचीकडाडी ॥ नाहींममतेचीआवडी ॥ कठिणपणाचीजोडी ॥ अ
सेरोकडीमजपासीं ॥ २३ ॥ तंवविचारवदेप्रौढी ॥ प्रवृत्तीनंदनेंकायबापुडीं ॥ तयासकळांतेंलवडसव
डी ॥ बांदवढीघालीन ॥ २४ ॥ सारासारविवंचना ॥ मजपासींअसेजाणा ॥ ह्मणोनत्यांचीगणना ॥ नाहीं
आपणाकांहींपैं ॥ २५ ॥ विवेकह्मणेजाणा ॥ तयासींआणीनरणा ॥ हानिर्धारमाझाजाणा ॥ सकळ
जनाठाउका ॥ २६ ॥ सर्वेचपरमार्थबोलेवाचा ॥ परमअर्थबुद्धीचा ॥ निरंतरवसेवाचा ॥ धीरवाचा

म.चं. वदेपैं ॥ २७ ॥ धीरह्मणेधारणाशास्त्र ॥ हेंमजपासींअसेनिरंतर ॥ कोणतेप्रवृत्तीपुत्र ॥ क्षणमात्रेंजिंकि अ० ७
जेती ॥ २८ ॥ तंवआनंदह्मणेहांसोनी ॥ ह्मणेऐकापांवचर्नी ॥ तेप्रवृत्तीसुतआणोनी ॥ वैसवीनएकेपं
॥ २ ॥ क्तीसीं ॥ २९ ॥ जेथेंमीआनंद ॥ तेथेंकैंचाविशब्द ॥ मगतींआपेंआपशुद्ध ॥ भजनअगाधकरितीलपैं ॥
॥ ३० ॥ तंवभक्तीह्मणेस्थळेंगोवीन ॥ तयांठावनाहींसाकरीन ॥ मजवश्यसाधुजन ॥ मीजाणनागवे
ची ॥ ३१ ॥ मजभक्तीपासाव ॥ देवप्रसन्नहोतीसर्व ॥ आणिकएककरणीअपूर्व ॥ मजपासावऐकपां
॥ ३२ ॥ एकींगुरुभजनकेलें ॥ सेवकींसेवकपणमांडिलें ॥ एकींपतिव्रताधर्मधरिले ॥ सेवनमांडिलें
स्वामीचें ॥ ३३ ॥ एककरितीसाधूचेंअर्चन ॥ एककरितीपितृभजन ॥ एकयज्ञयागहवन ॥ एकव्रतउ
द्यापनकरितीपैं ॥ ३४ ॥ एककरितीगोसेवन ॥ गंगामार्जनसडेसंमार्जन ॥ तुळसीसूर्यआराधन ॥ ना ॥ २ ॥
मकीर्तनभजनपैं ॥ ३५ ॥ ऐसाभक्तीचाबडिवार ॥ सांगतांअसेअपार ॥ तुह्मीचिंतानकरावीसाचार ॥

त्याअविचारप्रवृत्तीचा ॥ ३६ ॥ तंवशांतीह्मणेअवधारा ॥ चित्तघामाझियाउत्तरा ॥ याप्रवृत्तीचियाकु
मरा ॥ निर्धारागोवीन ॥ ३७ ॥ तींअसतीसदाउन्मत्तें ॥ परीमीकरीनशांतत्यांतें ॥ मत्सरसांडोनीतुह्मांतें ॥
तींसमस्तेंवोळंगती ॥ ३८ ॥ मजपाठीमाझ्याबहिणी ॥ असतीसहाजणी ॥ प्रवृत्तीच्याकुमरीपापिणी ॥
त्यांसींझाडणीहोयपैं ॥ ३९ ॥ ऐसींबहुतांचींवचनें ॥ ऐकोनीज्ञानउल्हासलेंमनें ॥ सुखमानिलेंनिवृत्ती
नें ॥ सकळांचियाबोलाबहुत ॥ ४० ॥ तंवबोलेज्ञानासीं ॥ ताताबचनपरियेसी ॥ कांहींद्रव्यदेणेयांसीं ॥
तेणेंसुखासींपावती ॥ ४१ ॥ आणिसन्नद्धहोतीनिपुण ॥ आपुलालेठायींजाण ॥ तेंउत्तरज्ञानेंऐकोन ॥
मानिलेंजाणअतिसुख ॥ ४२ ॥ तरीकोणकोणाकैसें ॥ द्रव्यवांटिलेंज्ञानेशें ॥ तेंऐकासावकाशें ॥ साव
धमानसेंकरोनी ॥ ४३ ॥ मगतयाज्ञानेंआपण ॥ भावासींदिधलेंज्ञान ॥ त्याकरितांतोअनुदिन ॥ सुख
संपन्नअपार ॥ ४४ ॥ मगतयावैराग्यासीं ॥ सदासंतुष्टपणदिधलेंपरियेसी ॥ तेणेंकरूनीतयासीं ॥ सु

खमानसींवाटलें॥ ४५ ॥ यानंतरें अवधारा ॥ समाधानदिधलेंविचारा ॥ तेणेंतोसुखाचापुरा ॥ झाला
खरामानसीं ॥ ४६ ॥ सारासारविवंचना ॥ विवेकादिधलीजाणा ॥ तेणेंत्याच्याअंतःकरणा ॥ अतिसु
खवाटलें ॥ ४७ ॥ धीरासत्वदिधलेंपरियेसा ॥ संतोषपावलाहर्षा ॥ परमार्थादिधलेंपरियेसा ॥ निःकपट
आणिनिर्द्वंद्व ॥ ४८ ॥ आनंदाब्रह्मानंदलाभला ॥ आत्मबोधेंडोलोंलागला ॥ मगहर्षाउत्साहदिल्हा ॥ सु
खावलाआनंदें ॥ ४९ ॥ मगज्ञानेश्वरें आपण ॥ व्यापकत्वघेतलेंपूर्ण ॥ तयाकरितांपरिपूर्ण ॥ स्वानंदेंसु
खावला ॥ ५० ॥ ऐसेंज्ञानेंतयेवेळा ॥ द्रव्यवांटोनीदिधलेंसकळां ॥ तेणेंकरोनीतयांला ॥ हर्षझालाअपा
र ॥ ५१ ॥ विचारवदेवचनें ॥ ह्मणेत्यांसींआधींदंडणें ॥ परीधर्मशास्त्रांलागींविरोधयेईलजाण ॥ तरी
शिष्टाईआधींकीजे ॥ ५२ ॥ शिष्टाईसींआधींपाठवणें ॥ राज्यमागावेंसामान्यपणें ॥ नदेतीतरीला
वणे ॥ शिक्षासमदळीं ॥ ५३ ॥ तंवविवेकह्मणेयथार्थ॥ वदलाविचारवचनार्थ ॥ तरीलक्षीत्वरित ॥ कव

णातेंपाठवावें ॥५४॥ निवृत्तीह्मणेबरवें ॥ सकळामानलेंस्वभावें ॥ अंतरपडोंनघावें ॥ सहजस्वभावें
नीतीसीं ॥ ५५॥ ऐकोनिज्ञानतयेसमर्यी ॥ लक्षिताझालापाहीं ॥ जोदृढअसेल्हृदयीं ॥ बुद्धिवंतठायींबो
लका ॥ ५६ ॥ ह्मणेआनंदापाठवावें ॥ तरीतोसदाआनंदभावें ॥ शिष्टाईउत्तरेंबोलावें ॥ हेंकार्यनव्हेत
याचें ॥ ५७॥ परमार्थतरीतोभोळा ॥ नजाणेचतुराईच्याकळा ॥ शिष्टाईतयावेल्हाळा॥ पाठवणेनघडे
॥ ५८ ॥ भावतरीभावार्थी ॥ त्यासींबोलायाचीनाहींयुक्ती ॥ शिष्टाईपाठवणेंदृढमती ॥ शाहणाआ
णिसज्ञान ॥ ५९ ॥ जरींवैराग्यासींपाठवणें ॥ तरीतयानावडेबोलणें ॥ चतुराईअंगीनमिरवणें ॥ तया
सींपाठवणेनघडेपैं ॥ ६० ॥ विचारविवंचनेचेठाईं ॥ दिवसरात्रींकर्मेंलपाहीं ॥ ह्मणोनीतोशिष्टाई ॥ पा
ठवितांनयेची ॥ ६१ ॥ संतोषआणिहर्ष ॥ हेराजयोगीराजस ॥ यांसींपाठवणेशिष्टाईस ॥ नेघेमान
ससर्वथा ॥ ६२ ॥ तरीविवेकपाहतांमज ॥ बुद्धिबोलकासुंदरसहज ॥ चातुर्यत्वकळासतेज ॥ हाअव

स्यपाठवावा ॥ ६३ ॥ सर्वलक्षणेजाणें ॥ बरवींबोधीलअंतःकरणें ॥ याविवेकासन्मुखजाणें ॥ बळठें
गणेंत्रैलोक्यीं ॥ ६४ ॥ तरीशिष्टाईसींशीघ्र॥ विवेकपाठवावाचतुर ॥ ऐसेंबोलेज्ञानेश्वर ॥ तेसकळा
मानलें ॥ ६५॥ तरीविवेकायेसमयीं ॥ तुह्मीजाणेशिष्टाई ॥ विवेकमंत्रेंकरूनीपाहीं ॥ प्रवृत्तीसुतसो
ईलावावे ॥ ६६॥ कायह्मणतीतेंऐकावें ॥ कळलतेंउत्तरद्यावें ॥ राज्यआपलेंमागावें ॥ समभावेंकरू
नियां ॥ ६७ ॥ किंवायुद्धाविणतेनदेत ॥ ऐसेंतरीकरावेंनेमस्त ॥ दोहींमाजीएकपदार्थ ॥ यावेंत्वरि
तसाधूनी ॥ ६८ ॥ ऐसेंसांगतांतयासीं ॥ नमनकरूनिसमस्तांसीं ॥ आज्ञाघेवोनिवेगेसीं ॥ शिष्टाई
सींचालिला ॥ ६९ ॥ विवेकजाईलमोहापासीं ॥ वचनेंहोतीलपरियेसी ॥ तेंपरियेसामानसीं ॥ श्रीनाथ
दासविनवीत ॥ ७० ॥ इतिश्रीमनश्चंद्रबोध ॥ निवृत्तीज्ञानेशअनुवाद ॥ परिसतांहोयआनंद ॥ सप्तमो
ध्यायरसाळहा ॥ ७१ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः॥ मोहबैसलासिंहासनीं॥सभोंवतीअविचाराचेस्थानीं॥तेथेंविवेकहोवोनी॥ पाहेलो
चर्नीसभोंवतें॥ १ ॥ सापत्नीकबंधुदेखिला॥ मोहेंबैसावयाठावकेला॥ परिअंतःकरणींदचकला॥ शत्रु
आलाह्मणोनी॥ २ ॥ मगमोहराजाबोलें॥ विवेकाकोणीकडेबिजेंकेले॥ इतुकेदिवसऐकिलें॥ परीनाहीं
देखिलेंतुह्मासीं॥ ३ ॥ विवेकह्मणेमोहासीं॥ कारणझालेंयावयासीं॥ निवृत्तीमातेनेंपरियेसी॥ तुह्मापा
सींपाठविलें॥ ४ ॥ आणिज्ञानाचेनिमतें॥ येणेंझालेंआह्मातें॥ सांगोंपाठविलेंतुह्मातें॥त्यानिरोपातेंसा
क्षेपेंऐका॥ ५ ॥ तरीऐकसावधु॥ तुह्मीआह्मीसापत्निकबंधु॥ तेथेंकायसाविरोधु॥ मिथ्याद्वंद्वराज्याकार
णे॥ ६ ॥ नीतीशास्त्रतरीऐसेंअसे॥ तेंसांगतोंऐकासावकाशें॥ हेंराज्यतरीबोलिलेंअसे॥ वडिलराणीच्या
पुत्रांसीं॥ ७ ॥ वडिलभाजपाठीची॥ निवृत्तीमाताआमुची॥ प्रवृत्तीतरीसापत्नची॥ मनारुचलीह्मणो
नी॥ ८ ॥ तयेचेतुह्मीकुमर॥ तुह्माराज्यआह्मावनांतर॥ हेंअयोग्यपाहतांविचार॥ परमार्थींसारमिळेना

